**"शंकरराव चव्हाण सुवर्णमहोत्सवी पत्रकार कल्याण निधी " या नावाने कल्याण निधीची स्थापन करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्र.माजम-२००९/५७३/प्र.क्र.१०४/३४**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक : १ ऑगस्ट, २००९**

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्य अधिस्विकृतीचे पदाधिकारी तसेच श्रमीक पत्रकार संघाचे पदाधिकारी यांचे समवेत वेळोवेळी झालेल्या बैठकांच्या अनुषंगाने पत्रकारांचा आकस्मिक मृत्यू झाल्यास किंवा दुर्धर आजार झाल्यास या प्रसंगी त्यांचे कुटूंगियांना मदत करण्याच्या दृष्टीने पत्रकार कल्याण निधीची स्थापना करण्याबाबतची मागणी वेळोवेळी करण्यात येत होती. या संदर्भात शासनाशी दि.१९/६/०९ रोजी झालेल्या बैठकीत महाराष्ट्र राज्याच्या सुवर्ण महोत्सवी वर्षात या कल्याण निधीची स्थापना करण्याबाबत विचार विनिमय झाला असून सदर कल्याण निधीच्या व्यवस्थापनासाठी विश्वस्त संस्थेची नोंदणी करणे, खाजगी माध्यमातून देणग्या स्विकारणे, विश्वस्त संस्थेवर विश्वस्तांची नेमणूक करणे, या संस्थेस विशिष्ट निधी उपलब्ध करुन देणे इ. मुद्यांवर देखिल बैठकीत चर्चा झाली. बैठकीत ठरल्यानुसार पत्रकारकल्याण निधीची स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-** पत्रकारांना दुर्धर आजार, अपघात झाल्यास किंवा आकस्मित मृत्यू झाल्यास त्यांना किंवा, त्यांच्या कुटुंबियास मदत करण्याच्या उद्देशाने **"शंकरराव चव्हाण सुवर्णमहोत्सवी पत्रकार कल्याण निधी "** या नावाने कल्याण निधीची स्थापना करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे. या कल्याण निधीच्या व्यवस्थापनासाठी महासंचालक, माहिती व जनसंपर्क यांच्या अध्यक्षतेखाली एक विश्वस्त संस्था (Trust) स्थापन करण्यास देखील याद्वारे शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्यांचा संगणक सांकेतांक **२००९०८०३१४११०१००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(तु. वि. लव्हटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
संचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
मा.मुख्यमंत्र्यांचे जनसंपर्क अधिकारी, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई
मा.राज्यमंत्री (मा.व ज.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
स्विय सहाय्यक, प्रधान सचिव / सचिव, मा.व ज.-सा.प्र.वि./वित्त /विधी व न्याय विभाग.
धर्मादाय आयुक्त, वरळी,मुंबई.

उपसंचालक (वृत्तशाखा), (प्रकाशने) यांजकडे प्रसिध्दीसाठी, माहिती व जनसंपर्कमहासंचालनालय, मुंबई,
उपसंचालक (माहिती) महाराष्ट्र परिचय केंद्र, नवी दिल्ली,
सर्व जिल्हा माहिती अधिकारी,
महालेखापाल  महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
महालेखापाल  महाराष्ट्र-१, (लेखा परिक्षा), मुंबई,
अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
**निवड नस्ती.**